**ग्राहक संरक्षण अधिनियम,१९८६**
**अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र,मुंबई यांना ग्राहक संरक्षण यंत्रणेतील प्रशासकीय बाबी हाताळण्यासाठी विभागप्रमुख म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/४८/प्र.क्र.८/ ग्रासं. ४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३४
तारीख: २४ सप्टेंबर, २०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः** अ.ना.पु. व ग्रा.सं.वि. शा.नि. क्र.ग्रासंक-२२१०/प्र.क्र.२६६/ग्रासं ३, दि.१६.११.२०११

२) **शासन निर्णय क्रमांकः** रा.ग्रा.त.नि.आ.,मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा/आस्था१/नि.प्रा/ विभागप्रमुख/२०१५/७३०, दि.२२.१.२०१५

प्रस्तावना -

ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ मधील तरतुदीनुसार राज्यात ग्राहकांच्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी राज्य स्तरीय राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाची व जिल्हा स्तरीय प्रत्येक जिल्हयात जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचाची स्थापना करण्यात आली. तसेच सदर अधिनियमातील सुधारित तरतुदीनुसार राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाची दोन परिक्रमा खंडपीठे स्थापन केली आहेत. तसेच जिल्हा स्तरावर एकूण ४० जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच स्थापन करण्यात आले व त्यासाठी वेगवेगळया संवर्गातील पदे निर्माण करण्यात आलेली असून सद्य स्थितीत ग्राहक संरक्षण यंत्रणेत एकूण ४९७ पदे मंजुर आहेत.

या विभागाच्या दि.१६.११.२०१३ च्या शासन निर्णयान्वये वैधमापन शास्त्र व ग्राहक संरक्षण यंत्रणेतील संवर्ग स्वतंत्र करण्यात आल्याने सद्य: स्थितीत ग्राहक संरक्षण यंत्रणेतील सर्व प्रशासकीय बाबी वैधमापन शास्त्र विभागापासून स्वतंत्र झालेली आहेत. त्या अनुषंगाने या विभागामार्फत ग्राहक संरक्षण यंत्रणेतील विविध संवर्गातील पदांचे सेवाप्रवेश नियम दि.१.१.२०१५ व दि.३.१.२०१५ रोजीच्या अधिसूचनेद्वारे अधिसूचीत करण्यात आले आहेत. दि.३.१.२०१५ च्या अधिसूचनेच्या अनुषंगाने राज्य आयोगाने दि.२२.१.२०१५ रोजी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन ग्राहक संरक्षण यंत्रणेतील गट-ब(अराजपत्रित), गट-क व गट-ड या संवर्गातील पदांच्या प्रशासकीय बाबी हाताळण्यासाठी अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र,मुंबई यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, यांच्या आस्थापनेवरील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड या संवर्गातील पदांच्या सर्व प्रशासकीय बाबी हाताळण्यासाठी अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र,मुंबई यांना महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ अंतर्गत नियम ९ (खंड-२२) च्या तरतुदीनुसार विभागप्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७६/१५/सेवा-६, दि.३१.८.२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२४१३२०२०८२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Raghavendra Krishnaji Mirji

Digitally signed by Raghavendra Krishnaji Mirji
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supplies and consumer protection dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Raghavendra Krishnaji Mirji
Date: 2015.09.24 13:26:14 +05'30'

**(रा.कृ.मिर्जी)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे सचिव,
४) मा.राज्यमंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव,
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
६) सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई,
७) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई,
८) सर्व मंत्रालयीन विभाग,
९) महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई/नागपूर, महाराष्ट्र
१०) महालेखापाल- (लेखापरिक्षा) १/२ ,मुंबई/नागपूर, महाराष्ट्र
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
१४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
१५) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
१६) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१८) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद,
१९) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई,
२०) परिक्रमा खंडपीठ नागपूर/औरंगाबाद,
२१) जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच (सर्व),
२२) सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-१२, मंत्रालय, मुंबई-३२,
२३) वित्त विभाग, विनियम/व्यय-४,मंत्रालय, मुंबई-३२,
२४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी